सहसंचालक (तांत्रिक) या पदावरील तात्पुरत्या नियुक्तीतील तांत्रिक खंड क्षमापित करणेबाबत... (डॉ. अभय एकनाथ वाघ)

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्र.संकीर्ण २०२४/प्र.क्र.१९/२४/तांशि-१**
४ था मजला, मंत्रालय (विस्तार), हुतात्मा राजगुरू चौक,
मादाम कामा मार्ग, मुंबई ४०००३२
दिनांक ०५ एप्रिल, २०२४

**प्रस्तावना:**

विभागाच्या दिनांक २९.०१.२००० रोजीच्या शासन निर्णयान्वये महाराष्ट्र लोकसेवा आयोग पुरस्कृत उमेदवार म्हणून डॉ. अभय वाघ यांची सहायक संचालक (तांत्रिक) या पदावर नामनिर्देशनाने नियुक्ती करण्यात आली होती. त्यानुसार, डॉ. वाघ सदर पदावर दिनांक २४.०२.२००० रोजी रूजू झाले. विभागाच्या दिनांक २९.०५.२००८ रोजीच्या शासन निर्णयान्वये डॉ. वाघ यांना उपसंचालक (तांत्रिक) या पदावर तात्पुरती पदोन्नती देण्यात आली. महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या मान्यतेअंती दिनांक १८.०३.२०११ रोजीच्या शासन निर्णयान्वये डॉ. वाघ यांची उपसंचालक (तांत्रिक) या पदावरील पदोन्नती नियमित करण्यात आली आहे.

आस्थापना मंडळ क्र. १ च्या दिनांक १६.०८.२०११ रोजीच्या बैठकीतील शिफारशींनुसार, विभागाच्या दिनांक ०७.०९.२०११ रोजीच्या शासन निर्णयान्वये डॉ. अभय वाघ यांना पदोन्नतीच्या कोट्यातील रिक्त सहसंचालक पदावर तात्पुरती पदोन्नती देण्यात आली. तसेच, सहसंचालक (तंत्र शिक्षण) पदावर दिलेल्या तात्पुरत्या पदोन्नतीस सामान्य प्रशासन विभागाच्या मान्यतेअंती वेळोवेळी ११ महिने किंवा महाराष्ट्र लोकसेवा आयोगाची मान्यता मिळेपर्यंत यापैकी जे अगोदर घडेल तोपर्यंत मुदतवाढ देण्यात आली आहे.

तद्नंतर, डॉ. अभय वाघ यांची महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत नामनिर्देशनाने संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय या पदावर नियुक्ती झाली असल्याने ते दिनांक २७.११.२०१७ (म.पू.) सदर पदावर हजर झाले.

तद्नंतर, डॉ. अभय वाघ यांनी सदस्य, महाराष्ट्र लोकसेवा आयोग या पदाचा कार्यभार दिनांक ०२.०२.२०२३ (म.पू.) रोजी स्विकारला असल्याने, “महाराष्ट्र लोकसेवा आयोग (सदस्य व कर्मचारी) (सेवेच्या शर्ती) विनियमन), १९७१” नियम ४ मधील तरतुदींनुसार दिनांक ०१/०२/२०२३ (म.नं) ते शासन सेवेतून मानीव सेवानिवृत्त झाले आहेत. तसेच, विभागाच्या दिनांक ०४ डिसेंबर, २०२३ रोजीच्या अधिसूचनेनुसार त्यांची आयोगातील सदस्य पदावरील सेवा अर्हताकारी सेवा म्हणून जमेस धरून शासन सेवेतील नियत वयोमान सेवानिवृत्तीच्या दिनांकापासून त्यांना निवृत्तीवेतन व इतर अनुषंगिक लाभ अनुज्ञेय करण्यात आले आहेत.

डॉ. अभय वाघ हे शासन सेवेतून नियतवयोमानानुसार दिनांक ३१.०५.२०२४ रोजी सेवानिवृत्त होत आहेत. डॉ. वाघ यांचे सेवापुस्तक वेतन पडताळणी पथकास सादर करण्यात आले असता, डॉ. वाघ यांना तात्पुरती पदोन्नती देण्यात आली असल्याने तांत्रिक खंड क्षमापित करून त्यांच्या वेतनवाढीच्या नोंदी प्रमाणित करणे आवश्यक असल्याबाबत आक्षेप नोंदविण्यात आला आहे.

महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम, १९८१ मधील नियम ४८(१) नुसार नियुक्ती प्राधिकारी आदेशाद्वारे शासकीय कर्मचाऱ्याच्या सेवेतील खंड क्षमापित करू शकेल, अशी तरतूद आहे. त्यानुसार, डॉ. अभय वाघ यांना सहसंचालक (तांत्रिक) पदावर देण्यात आलेल्या तात्पुरत्या पदोन्नतीतील तांत्रिक खंड क्षमापित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम, १९८१ मधील नियम ४८(१) नुसार, डॉ. अभय एकनाथ वाघ यांना सहसंचालक (तांत्रिक) या पदावर देण्यात आलेल्या तात्पुरत्या पदोन्नतीतील पुढीलप्रमाणे तांत्रिक खंड क्षमापित करण्यास मान्यता देण्यात येत आहे-

| शासन निर्णयाचा दिनांक | तात्पुरत्या पदोन्नतीचा कालावधी | तांत्रिक खंड | तांत्रिक खंड कालावधी |
|---|---|---|---|
| ०७/०९/२०११ | ०७/०९/२०११ ते ०६/०८/२०१२ | - | |
| ३१/०८/२०१२ | ०८/०८/२०१२ ते ०८/०७/२०१३ | ०७/०८/२०१२ | ०१ दिवस |
| ०९/०७/२०१३ | ०९/०७/२०१३ ते ०५/०६/२०१४ | ०८/०७/२०१३ | ०१ दिवस |
| ०६/०६/२०१४ | ०७/०६/२०१४ ते ०५/०५/२०१५ | ०६/०६/२०१४ | ०१ दिवस |
| ०७/१०/२०१६ | ०७/०५/२०१५ ते ०६/०४/२०१६ | ०६/०५/२०१५ | ०१ दिवस |
| **एकूण तांत्रिक खंड कालावधी** | | | **०४ दिवस** |

२. सदर शासन निर्णय सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०४०५१७४०२४५७०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PAGARE SHRIKRISHNA KASHINATH

Digitally signed by PAGARE SHRIKRISHNA KASHINATH
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT, 2.5.4.20=cc78d6dbb4fe0c3d5473ed374dc1007ae7db08a8a6ca9468ce2a8aae16c0cb06, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=4E8BC157609C105D396B04018FA47F8909333AFC18DDC3893CC043F18F759C0B, cn=PAGARE SHRIKRISHNA KASHINATH
Date: 2024.04.05 18:05:32 +05'30'

**( श्रीकृष्ण पगारे )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई

२. प्रधान महालेखापाल लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा, महाराष्ट्र १, मुंबई

३. प्रधान सचिव (उच्च व तंत्र शिक्षण) विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई

४. संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई

५. संचालक, संचालनालय लेखा व कोषागारे, मुंबई

६. डॉ. अभय एकनाथ वाघ, सदस्य, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, बेलापूर, नवी मुंबई

७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई

८. निवड नस्ती, तांशि-१